**चंद्रपूर जिल्हयातील विसापूर, तालुका बल्लारपूर येथे बॉटनिकल गार्डनच्या परिसरात विविध इमारतींमध्ये Dry Chemical Gun Type Fire Extinguisher पुरवठा आणि स्थापित करण्याच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.२८/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०९ मार्च, २०२२

वाचा :-

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२४/लेखा/प्र.क्र.२०(२०२१-२२)/५३१/२०२१-२२, दिनांक १७.०१.२०२२.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९
३. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९

प्रस्तावना:-

मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर या वनवृत्तांतर्गत चंद्रपूर जिल्हयातील विसापूर, तालुका बल्लारपूर येथे बॉटनिकल गार्डनच्या परिसरात विविध इमारतींमध्ये Dry Chemical Gun Type Fire Extinguisher पुरवठा आणि स्थापित करण्याच्या कामाचे रु.१,४८,६०,१००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णय दिनांक २०.०९.२०१९ मधील भाग एक उपविभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे संदर्भ क्र.३ दिनांक २५.०९.२०१९ च्या परिपत्रकान्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु.१५ कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधीत उपभोक्ता विभागास देण्यात आलेले आहेत.

सदर अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर यांची तांत्रिक सहमती प्रदान करुन मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सिव्हील लाईन, नागपूर यांचेकडून तांत्रिक सहमती / मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचा संदर्भ क्र.२ चा शासन निर्णय व सार्वजनिक बांधकाम विभागाचे संदर्भ क्र.३ चे परिपत्रक विचारात घेता, चंद्रपूर जिल्हयातील विसापूर, तालुका बल्लारपूर येथे बॉटनिकल गार्डनच्या परिसरात विविध इमारतींमध्ये Dry Chemical Gun Type Fire Extinguisher पुरवठा आणि स्थापित करण्याच्या कामाचे रु.१,४८,६०,१००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रकास खालील अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. अंदाजपत्रक व नकाशे उपभोक्ता विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून साक्षांकित करुन घेण्यात यावे.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक:बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
५. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
६. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
७. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.
८. वित्त विभागाच्या दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१, १४.१०.२०२१, २१.१०.२०२१, ०३.०१.२०२२, २८.०१.२०२२ व ०३.०२.२०२२ परिपत्रक व शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
९. शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भातील शासन निर्णयातील भाग एक उपविभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९ अन्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु.१५ कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे उपभोक्ता विभागास प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१०११५९४६४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.-

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2022.03.10 12:02:11 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.७
९. कार्यासन फ-२/ब-१ , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)